महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील अतिरिक्त संचालक / सह संचालक /उप संचालक या पदांवर पदश्रेणी अवनत करून बदलीने पदस्थापना देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पदस्था-२०२३/प्र.क्र.२१७/सेवा-२**
गो. ते. रुग्णालय इमारत, १० मजला, ए विंग,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : ११ ऑगस्ट, २०२३

**शासन आदेश -**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील अतिरिक्त संचालक/सह संचालक/उप संचालक, आरोग्य सेवा या संवर्गातील पदे मोठ्या प्रमाणात रिक्त असल्याने सदर पदे श्रेणीअवनत करून तात्पुरत्या स्वरूपात निम्न संवर्गातील अधिकाऱ्यांमधून बदलीने भरण्यात येतात. त्यानुसार महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४), कलम ४(५) आणि कलम ६ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील अतिरिक्त संचालक/सह संचालक/उप संचालक, आरोग्य सेवा या संवर्गातील पदांवर तात्पुरत्या स्वरूपात पदश्रेणी अवनत करून खालील अधिकाऱ्यांची खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| क्र. | अधिकाऱ्यांचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १. | **डॉ.अशोक नांदापूरकर** ,<br>उप संचालक आरोग्य सेवा (कु.क.) पुणे<br>(पदश्रेणी अवनत) | **सह संचालक, आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण), पुणे.**<br>**(पदश्रेणी अवनत)** |

२. उक्त अधिकाऱ्यांची वरिष्ठ संवर्गातील पदावर पदश्रेणी अवनत करून बदलीने पदस्थापना करण्यात येत असल्याने त्यांना वरिष्ठ संवर्गात नियमित पदोन्नतीचा हक्क सांगता येणार नाही अथवा सेवाज्येष्ठतेचा दावा करता येणार नाही. तसेच, त्यांना वरिष्ठ संवर्गातील पदाची वेतनश्रेणी अनुज्ञेय राहणार नाही.

३. आरोग्य सेवा आयुक्तालयांतर्गत मुंबई व पुणे येथील मुख्यालय/कार्यालयांच्या बळकटी करणासाठी प्रशासकीय निकड, अनुभव विचारात घेता, एक व्यक्ती एक पद या तत्वावर सदर पदस्थापना तात्पूरत्या स्वरुपात देण्यात येत आहे. वरिष्ठ संवर्गातील अधिकारी पदोन्नतीने अथवा सरळसवेने उपलब्ध झाल्यास संबंधित अधिकाऱ्यांना त्यांच्या मूळ संवर्गात बदलीने पदस्थापना देण्यात येईल.

४. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांना व शासनास सादर करावा.

५. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

६. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे, जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती “अनधिकृत अनुपस्थिती” म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव सर्व संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

७. संबंधित अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत त्यांचेविरुध्द आयुक्तालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

८. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

९. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८१११४५९१२३८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VASANT PANDURANG GAIKWAD

Digitally signed by VASANT PANDURANG GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=6762a1c7f462bd961625d44d6971dc2c9f06f3437a7f750c414e77ec2b7f466d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7C71DE18A037CE1808BB4E1BA5462D93EB69C5FEB96700EDA8ADF1B3C9C753F8, cn=VASANT PANDURANG GAIKWAD
Date: 2023.08.11 16:52:28 +05'30'

(व.पां.गायकवाड)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा(१/२), मुंबई /पुणे.
३) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
६) उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ (सर्व)
७) जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय (सर्व)
८) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
११) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
१२) मा. मुख्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक

१३) मा.मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
१४) अपर मुख्य सचिव, सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१५) सचिव (२), सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१६) संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचेमार्फत)
१७) निवडनस्ती (सेवा - २)